अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१८-२०१९
“२२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना ( २२१५ १८४३)”
मागणी क्रमांक वाय -२

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११५/पापु-२३**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख : ३० जून, २०१८

वाचा :-

१. शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८
२. शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११५/पापु-२३, दि. २० एप्रिल, २०१८

प्रस्तावना :-

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ करिता ०१, वेतन साठी रुपये ३३,४६,७६,०००/-(अक्षरी रुपये तेहत्तीस कोटी सेहेचाळीस लाख श्याहत्तर हजार फक्त) व ११, देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये १,१२,१७,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी बारा लाख सतरा हजार फक्त ) अशी एकूण रुपये ३४,५८,९३,०००/- (अक्षरी रुपये चौतीस कोटी अठ्ठावन्न लाख त्र्याण्णव हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाने सन २०१८-१९ करीता सदर तरतूदीपैकी ७० % निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. सदर तरतुदीपैकी जिल्हा परिषदांना माहे एप्रिल, २०१८ ते जून, २०१८ या तीन महिन्यांकरीता ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्चासाठी एकूण ६,४९,४८,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी एकोणपन्नास लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त ) इतके अनुदान वाचा मधील अनुक्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहेत. आता जिल्हा परिषदांनी उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत केलेला प्रत्यक्ष खर्च विचारात घेऊन माहे जुलै, २०१८ ते डिसेंबर, २०१८ या सहा महिन्यांकरीता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन व प्रवासखर्च भागविण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली ०१, वेतन या उद्दीष्टाखाली रुपये ११,६३,००,०००/- तसेच ११, देशांतर्गत प्रवास खर्च या उद्दीष्टाखाली रुपये ५,१२,०००/- याप्रमाणे एकूण रुपये ११,६८,१२,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी अडुसष्ठ लाख बारा हजार फक्त ) इतका निधी या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS

द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" ०१, वेतन व ११ देशांतर्गत प्रवास खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६३०१०१११८२४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb B Hajare

Digitally signed by Balasaheb B Hajare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, cn=Balasaheb B Hajare
Date: 2018.06.30 11:10:49 +05'30'

**बाळासाहेब बा. हजारे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व

४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
६. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
७. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
११.महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३.उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद, सर्व
१४.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१५.वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१६.कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१७.ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१८.निवड नस्ती कार्यासन पापु-२३

विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४१८/प्र.क्र.११५/पापु-२३, दिनांक ३० जून, २०१८ सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०१८-२०१९ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले अनुदान | | | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| | | वेतन | देशांतर्गत प्रवास खर्च | वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (३+४) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ५३०००००० | ० | ५३०००००० | रूपये त्रेपन्न लाख फक्त |
| २ | पालघर | २९००००० | १००००० | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| ३ | रायगड | ३७००००० | ५०००० | ३७५०००० | रूपये सदतीस लाख पन्नास हजार फक्त |
| ४ | रत्नागिरी | ३५००००० | ० | ३५००००० | रूपये पस्तीस लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | २२००००० | ० | २२००००० | रूपये बावीस लाख फक्त |
| ६ | नाशिक | ३२००००० | ० | ३२००००० | रूपये बत्तीस लाख फक्त |
| ७ | धुळे | ११००००० | ० | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | १८००००० | ० | १८००००० | रूपये अठरा लाख फक्त |
| ९ | जळगांव | २२००००० | ० | २२००००० | रूपये बावीस लाख फक्त |
| १० | अहमदनगर | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| ११ | पुणे | ६७००००० | ० | ६७००००० | रूपये सदुसष्ठ लाख फक्त |
| १२ | सातारा | ४७००००० | ० | ४७००००० | रूपये सत्तेचाळीस लाख फक्त |
| १३ | सांगली | ३०००००० | ० | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| १४ | सोलापूर | ५५००००० | ० | ५५००००० | रूपये पंचावन्न लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | ४९००००० | ० | ४९००००० | रूपये एकोणपन्नास लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | ४३००००० | ० | ४३००००० | रूपये त्रेचाळीस लाख फक्त |
| १७ | जालना | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| १८ | परभणी | २९००००० | ० | २९००००० | रूपये एकोणतीस लाख फक्त |
| १९ | हिंगोली | ८००००० | ० | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २० | बीड | २६००००० | ० | २६००००० | रूपये सव्वीस लाख फक्त |
| २१ | नांदेड | ४८००००० | १००००० | ४९००००० | रूपये एकोणपन्नास लाख फक्त |
| २२ | उस्मानाबाद | ३४००००० | ४८००० | ३४४८००० | रूपये चौतीस लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त |
| २३ | लातूर | ५८००००० | ० | ५८००००० | रूपये अठ्ठावन्न लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | १२००००० | ० | १२००००० | रूपये बारा लाख फक्त |
| २५ | अकोला | ७००००० | १७०००० | ८७०००० | रूपये आठ लाख सत्तर हजार फक्त |
| २६ | वाशिम | ४२००००० | ० | ४२००००० | रूपये बेचाळीस लाख फक्त |
| २७ | अमरावती | २१००००० | ० | २१००००० | रूपये एकवीस लाख फक्त |
| २८ | यवतमाळ | ४०००००० | ० | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| २९ | वर्धा | ३१००००० | ० | ३१००००० | रूपये एकतीस लाख फक्त |
| ३० | नागपूर | ४६००००० | ० | ४६००००० | रूपये सेहेचाळीस लाख फक्त |
| ३१ | भंडारा | ४४००००० | ० | ४४००००० | रूपये चवेचाळीस लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | २४००००० | ० | २४००००० | रूपये चोवीस लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | ३७००००० | ० | ३७००००० | रूपये सदतीस लाख फक्त |
| ३४ | गडचिरोली | ३१००००० | ४४००० | ३१४४००० | रूपये एकतीस लाख चवेचाळीस हजार फक्त |
| एकूण | | ११६३००००० | ५१२००० | ११६८१२००० | रूपये अकरा कोटी अडुसष्ठ लाख बारा हजार फक्त |

Balasaheb B Hajare

Digitally signed by Balasaheb B Hajare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, cn=Balasaheb B Hajare
Date: 2018.06.30 11:10:20 +05'30'

(बाळासाहेब बा. हजारे )

कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन